महाराष्ट्र गोसेवा आयोग अंतर्गत नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : पविआ-१०२४/प्र.क्र.१९९/पदुम-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २० ऑगस्ट, २०२४.

**वाचा**-: १. शासन पत्र क्र. पविआ १०२३/प्र.क्र.११०/पदुम-३, दि. २८.०४.२०२३ रोजीचे पत्र

२. आयुक्त पशुसंवर्धन यांचे जा. क्र. मगोआ/लेखा/ डिडिओ कोड/ ३७४-७५ /२०२४,दि.१०.०७.२०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र गोसेवा आयोग अधिनियम, २०२३ अन्वये राज्यात महाराष्ट्र गोसेवा आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्र गोसेवा आयोग अधिनियम, २०२३ मधील कलम १४(२) नुसार आयोगाने लेखी प्राधिकृत केलेल्या व्यक्तीव्दारे आयोगाचे निधीचे कार्यान्वयन करण्यात येईल, अशी तरतूद आहे. त्यानुसार आयोगाने त्यांच्या दि. १०.०७.२०२४ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र गोसेवा आयोग या कार्यालयाचे “लेखाधिकारी” यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यास व “सदस्य सचिव, महाराष्ट्र गोसेवा आयोग ” यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्याचा प्राप्त झालेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र गोसेवा आयोग अधिनियम, २०२३ अन्वये महाराष्ट्र गोसेवा आयोगास विहित केलेली कार्ये पार पाडताना आयोगाकडे प्राप्त होणारा “गोसेवा आयोग निधी” चे कार्यान्वयन करण्यासाठी प्रस्तुत अधिनियमातील कलम १४ (२) नुसार लेखी प्राधिकृत केलेल्या महाराष्ट्र गोसेवा आयोगाचे “लेखाधिकारी” यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यास व सदस्य सचिव, महाराष्ट्र गोसेवा आयोग यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्याची विनंती, महाराष्ट्र गोसेवा आयोग यांनी शासनास केली आहे. तद्नुषंगाने महाराष्ट्र गोसेवा आयोगाच्या खालील अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | कार्यालय | नियंत्रक अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र गोसेवा आयोग, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव, महाराष्ट्र गोसेवा आयोग | लेखाधिकारी (गट-ब), महाराष्ट्र गोसेवा आयोग |

२.	आहरण व संवितरण अधिकारी यांनी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. संकिर्ण १००९/प्र.क्र.२६/कोषा प्र-५, दिनांक २४ जून, २००९ मधील तरतूदीनुसार आहरण व संवितरण अधिकारी संकेतांक प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही करावी.

३.	सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६०/१५/कोषा प्रशा-५, दि.१२.०८.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.	सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असुन त्याचा सांकेतांक २०२४०८२०१०५७०७५१०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.08.20 11:14:57 +05'30'

**( नि.भा.मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, (व्यय / लेखा व कोषागारे), वित्त विभाग मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई
६. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
८. अध्यक्ष, महाराष्ट्र गोसेवा आयोग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र गोसेवा आयोग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व विभागीय आयुक्त
११. सर्व जिल्हाधिकारी
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१३. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन,
१४. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
१५. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
१६. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त,
१७. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,
१८. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती पदुम-३